जलयुक्त शिवार अभियान २.० आणि
गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार
योजना या योजना राबविणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण-०६२३/प्र.क्र.९९/१४-अे**

मंत्रालय,मुंबई-४०० ०३२

दिनांक : ८ जून, २०२३

**वाचा:-** १. ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्र : गामुध-२०१७/प्र.क्र.१३४/जल-१ दि. ०६ मे, २०१७

२. शासन निर्णय मृद व जलसंधारण विभाग क्र. जशिअ-२०२२/प्र.क्र.३०२/जल-७, दि. ०३ जानेवारी, २०२३

३. मृद व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्र. गामुध-२०२२/प्र.क्र.२२/जल-१३, दि.२० एप्रिल, २०२३.

४. शासन परिपत्रक मृद व जलसंधारण विभाग क्र.गामुध २०२२/प्र.क्र.२२/जल-१३, दि. २४ मे, २०२३.

५.मृद व जलसंधारण विभागाचे क्र. जशिअ-२०२३/प्र.क्र.१८(भाग-४)/जल-७, दि.३१ मे,२०२३ च्या पत्रान्वये निर्गमित केलेले दि. २४ मे, २०२३ रोजी पार पडलेल्या आढावा बैठकीचे इतिवृत्त.

**शासन परिपत्रक :-**

जलयुक्त शिवार अभियान प्रथम टप्पा तसेच इतर पाणलोट क्षेत्र विकास कार्यक्रम न राबविलेल्या व गाव निवडीच्या निकषानुसार पात्र ठरणाऱ्या गावांमध्ये मृद व जलसंधारणाची कामे करणे, जलयुक्त शिवार अभियान प्रथम टप्पा तसेच इतर पाणलोट क्षेत्र विकास कार्यक्रम राबविलेल्या व गावांमध्ये पाण्याची गरज असेल व अडविण्यास अपधाव शिल्लक असेल तेथे पाणलोट विकासाची कामे करणे, मृद व जलसंधारणाची कामे लोकसहभागातून करणे व उपलब्ध भूजलाच्या माध्यमातून पाणलोट क्षेत्राचा शाश्वत विकास करण्याकरीता “जलयुक्त शिवार अभियान २.०” राबविण्यास संदर्भ २ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर शासननिर्णयान्वये जलयुक्त शिवार अभियान २.० हा कार्यक्रम राबविण्याच्या सविस्तर सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत.

२. तसेच राज्यातील जलसाठ्यांमधील गाळ काढणे व तो शेतांमध्ये वापरणे यासाठी राज्यातील जलसाठ्यांतील गाळ काढून तो शेतांत पसरविण्यासाठी “गाळमुक्त धरण गाळयुक्त शिवार” योजना राज्यात कायमस्वरुपी राबविण्याचा निर्णय मृद व जलसंधारण विभागाच्या दिनांक २० एप्रिल, २०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. सदर शासन निर्णयानुसार राज्यातील जलसाठ्यातून गाळ काढण्याबाबतची कार्यपद्धती नमूद केली आहे.

३. संदर्भ ५ येथील बैठकीच्या इतिवृत्तानुसार जलयुक्त शिवार अभियान २.० व गाळमुक्त धरण गाळयुक्त शिवार या दोन्ही योजना शीघ्र गतीने राबविण्याच्या अनुषंगाने कृषि विभागाच्या सक्रीय सहभागाकरीता सूचना प्राप्त झाल्या आहेत.

४. जलयुक्त शिवार अभियान २.० व गाळमुक्त धरण गाळयुक्त शिवार या दोन्ही योजनांच्या काटेकोर अंमलबजावणीसाठी स्थापिलेल्या जिल्हा स्तरावरील जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील संनियंत्रण समितीमध्ये जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी हे सदस्य असून तालुका स्तरावरील संनियंत्रण समितीमध्ये तालुका कृषि अधिकारी हे सदस्य आहेत.

५. सदर दोन्ही योजना शीघ्रगतीने व यशस्वीपणे राबविण्याच्या अनुषंगाने जिल्हाधिकारी यांच्या निर्देशानुसार जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी व तालुका कृषि अधिकारी यांनी आवश्यक ती कार्यवाही करावी व सदर दोन्ही योजना प्रभावीपणे राबविण्यात याव्यात.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक क्र. २०२३०६०८१७२४४४८५०१ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्याचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANTOSH
BANSIRAO KARAD

Digitally signed by SANTOSH BANSIRAO KARAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=f981d5a9fec2e5d5dc36f39695b5f0e4ff5b340cd5420df7cbaa28990d692e36, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=90BBB9D3E7E74DE43F8070E2A9A65BFD42747F1995A4F22FDC0240939AAB0835, cn=SANTOSH BANSIRAO KARAD
Date: 2023.06.08 17:25:26 +05'30'

**(संतोष ब. कराड)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५. सर्व सन्माननीय विधानसभा/विधानपरिषद व संसद सदस्य
६. मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
७. मा. मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव
८. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव
९. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
१०.सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई
११.प्रधान सचिव (कृषि), मंत्रालय, मुंबई
१२.सर्व विभागीय आयुक्त
१३.आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे
१४.महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मुंबई (प्रसिद्धीकरीता)
१५.सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१६.सर्व जिल्हाधिकारी
१७.सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१८. निवडनस्ती (कार्यासन-१४अे).